**सन २०२४-२५ करिता लेखाशीर्ष २२४५ ०१५५ व २२४५ ०३१५ अंतर्गत उणे (-) प्राधिकार पत्रावर कोषागारातून रक्कम आहरित करण्याकरिता प्राधिकृत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन,आ.व्य.प्रभाग)**
**शासन निर्णय क्र एससीवाय-०४/२०२४/प्र.क्र.३६/म-११**
मादाम काम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय,मुंबई-४०००३२.
दिनांक:- २२ एप्रिल, २०२४

**वाचा :** शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस-२०२२/प्र.क्र.३४९/म-३, दि.२७.३.२०२३

**प्रस्तावना :-**

राज्यात अचानक उद्भवणाऱ्या नैसर्गिक आपत्तीमध्ये पंचनामे होऊन प्रस्ताव प्राप्त होऊन बाधितांना मदत वितरीत करण्यासाठी बराच कालावधी जातो. त्यामुळे नैसर्गिक आपत्तीमध्ये मनुष्यहानी झाल्यास मृत व्यक्तीच्या कुटुंबियांना सहाय्य व जखमींना मदत वाटप करणे शक्य व्हावे, म्हणून राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या दरानुसार लेखाशीर्ष २२४५ ०१५५ व लेखाशीर्ष २२४५ ०३१५ अंतर्गत उणे (-) प्राधिकार पत्रावर कोषागारातून रक्कम आहरित करण्यासाठी मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात नैसर्गिक आपत्तीमध्ये **मनुष्यहानी** झाल्यास मृत व्यक्तीच्या कुटुंबियांना सहाय्य व जखमींना मदत वाटप करणे शक्य व्हावे, याकरिता मागणी क्र.सी-६; मुख्य लेखाशीर्ष २२४५, नैसर्गिक आपत्तींच्या निवारणासाठी अर्थसहाय्य; ०२ पूर, चक्रीवादळे इ.; १०१, अनुग्रह सहाय्य; (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च; (९१) (०१) रोख भत्ता, मृत व्यक्तींच्या कुटुंबियांना सहाय्य व जखमींना मदत (अनिवार्य), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) **(२२४५ ०१५५)** या लेखाशीर्षांतर्गत उणे (-) प्राधिकार पत्रावर कोषागारातून रक्कम आहरित करण्यासाठी मान्यता देण्यात येत आहे. तसेच नैसर्गिक आपत्तीमध्ये **पशुहानी** झाल्यास मृत जनावराऐवजी पशुधन खरेदीसाठी अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांना मदत वाटप करणे शक्य व्हावे, याकरिता मागणी क्र.सी-६; मुख्य लेखाशीर्ष २२४५, नैसर्गिक आपत्तींच्या निवारणासाठी अर्थसहाय्य; ०२ पूर, चक्रीवादळे इ.; ११७, पशुधन खरेदीसाठी शेतकऱ्यांना सहाय्य; (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च; (९१) (०१) मृत जनावराऐवजी पशुधन खरेदीसाठी अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांना सहाय्य (अनिवार्य), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) **(२२४५ ०३१५)** या लेखाशीर्षांतर्गत उणे (-) प्राधिकार पत्रावर कोषागारातून रक्कम आहरित करण्यासाठी मान्यता देण्यात येत आहे.

२. नैसर्गिक आपत्तीमध्ये मनुष्यहानी/पशुहानी झाल्यास बाधितांना द्यावयाची मदत वाचा येथील नमूद दि.२७.३.२०२३ च्या शासन निर्णयानुसार राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकांनुसार देण्यात यावी.

३. उणे प्राधिकारपत्रावर निधी वितरीत करताना संबंधित अधिकारी यांनी उक्त बाबींचे पंचनामे झाले असल्याची तसेच झालेले नुकसान हे नैसर्गिक आपत्तीमुळे झाले असल्याची खातरजमा करून (शव विच्छेदन अहवाल) निधी वितरीत करावा. तसेच, पशुधन नुकसानीबाबत आवश्यक तेथे पशुधनाची नोंदणी NDLM पोर्टलवर झाल्याबाबत संबंधित पशुधन विकास अधिकारी यांचा अहवाल तपासून निधी वितरीत करावा. याबाबतचा अहवाल निधी मागणीच्या विहीत नमुन्यात वेळोवेळी शासनास सादर करावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१८२/२०२४/व्यय-९, दि.१८.०४.२०२४ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०४२२१२३८४३४५१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHOBHA SIDRAM GAIKWAD

Digitally signed by SHOBHA SIDRAM GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=6ce79e4118d3f8dc903d5d7a251b6ae278df2bd83241bcb08e4970ca1e043c6f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0122946CA612499B33E243FD18A1730AAF64312287DA0BD70F1A97D5A80F61ED, cn=SHOBHA SIDRAM GAIKWAD
Date: 2024.04.22 12:51:06 +05'30'

**( शोभा गायकवाड )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/ विधान सभा, महाराष्ट्र विधान भवन, मुंबई
४. विधान मंडळाचे सर्व सन्माननीय सदस्य
५. अपर मुख्य सचिव ( वित्त), मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव ( पदुम), मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध,पुणे
८. सर्व विभागीय आयुक्त
९. सर्व जिल्हाधिकारी
१०.मा.महालेखापाल -१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
११.मा.महालेखापाल -१/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
१२.संचालक, लेखा व कोषागरे, मंत्रालय, मुंबई
१३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४.सर्व जिल्हा कोषागर अधिकारी
१५.वित्त विभाग (व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय, मुंबई
१६.सह सचिव, (ब-१/२), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.कार्यासन अधिकारी म-३, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. निवडनस्ती (म-११)